58/D:\Bolade-1\Prt-2\G.R/39

संरक्षक व्यवस्था नसलेल्या रेल्वेरुळ ओलांडणी
च्या ठिकाणी विशिष्ट सावधगिरी घेण्याबाबत
जनतेला व वाहन चालकांना सूचना देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

परिपत्र क्रमांक : विकाक ०७०५/६३३/परि-२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ३० नोव्हेंबर, २००५.

परिपत्रक

संरक्षक व्यवस्था नसलेल्या रेल्वेरुळ ओलांडणीच्या ठिकाणी जनतेकडुन व वाहन चालकाकडुन विशिष्ट सावधगिरी घेतली जात नसल्याने अपघात होतात व निरपराध व्यक्ती मरण पावतात. सध्या अशाप्रकारे होणाऱ्या अपघातांच्या प्रमाणात मोठ्या प्रमाणात वाढ झाल्याचे निदर्शनास आल्याने रेल्वे मंत्रालय, भारत सरकार यांनी यासंबंधी घ्यावयाच्या खबरदारीबाबत जनजागृती करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत. त्यानुषंगाने सूचित करण्यात येते की, मोटार वाहन कायदा १९८८ च्या कलम १३१ मधील तरतुदीनुसार "संरक्षक व्यवस्था नसलेल्या रेल्वे रुळ ओलांडणी जवळ पोहोचलेल्या प्रत्येक मोटार चालकाने आपले वाहन थांबवून रेल्वे येत नसल्याची खात्री करुन रेल्वे रुळ ओलांडणे आवश्यक आहे." परंतु अतिउत्साही वाहनचालक याबाबत काहीही खातरजमा न करता रेल्वे रुळ ओलांडतात व अशावेळी रेल्वे येत असल्यास अपघात होऊन निरपराध व्यक्ती मृत्युमुखी पडतात. तसेच रेल्वेच्या मालमत्तेचे नुकसानही होते. तसेच अशाप्रकारे मोटार वाहनचालक रेल्वे ओलांडत असल्याचे दिसून येत असूनही रेल्वे चालक रेल्वे थांबविण्यास असमर्थ असतो. त्यामुळे अशा ठिकाणी रेल्वे रुळ ओलांडताना मोटार वाहन चालकाने खबरदारी घेणे आवश्यक आहे.

२. तरी आपणांस सूचित करण्यात येते की, मोटार वाहन कायदा १९८८ च्या कलम १३१ ची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने वर्तमानपत्रे, टि.व्ही, रेडीओ, चित्रपटगृह व इतर प्रसार माध्यमाद्वारे वाहन चालकाने व जनतेने घ्यावयाच्या खबरदारीबाबत सूचना देणे आवश्यक आहे. तसेच अशा ठिकाणापासून ५००-६०० मीटर अंतरावर सूचना फलक प्रदर्शित करणे आवश्यक आहे. सबब अंमलबजावणी करण्याकरिता संरक्षक व्यवस्था नसलेल्या रेल्वेरुळ ओलांडणीच्या ठिकाणी घ्यावयाच्या खबरदारीबाबत आपल्या अधिपत्याखाली अधिकारी / कर्मचारी यांना सूचना देण्यात याव्यात. जेणेकरुन कायद्याची प्रभावीपणे अंमलबजावणी होवुन निरपराध व्यक्तीचे प्राण वाचतील.

३. तरी उक्त नमुद केल्याप्रमाणे तात्काळ आवश्यक कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( रमेश शिंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रती,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सर्व पोलीस आयुक्त / सर्व पोलीस अधिक्षक
निवडनस्ती, परिवहन-२.